

# महाराष्ट्र शासन

दुरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७
ई -मेल-dokh.rfd@maharashtra.gov.in

**क्रमांक:-गौखनि-३७/०४१८/प्र.क्र.१७६/ख**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १२ ऑक्टोबर,२०२०.

**विषय:- गौण खनिज-सोलापूर**

सन २०१२-२०१३ या वर्षाकरिता मौजे गणेशगाव, ता.माळशिरस, जि.सोलापूर या वाळूगटाचा ताबा न दिल्यामुळे लिलावाची शासनजमा केलेली संपूर्ण रक्कम परत करणेबाबत.

**मे.लक्ष्मी इंडस्ट्रीज तर्फे प्रो.प्रा.श्री.महेश नामदेव इंगळे**

**शासन ज्ञापन :-**

जिल्हाधिकारी, सोलापूर यांना त्यांचे पत्र क्र.मशा/ कार्या/२/ गौख/ आरआर/ ९१५/१५, दि.२७/३/२०१५, क्र.मशा/कार्या-१/गौख/आरआर-३७८१/१९, दि.१४/१/२०१९ व क्र.मशा/कार्या-१/गौख/ आरआर-१३८८/१९, दि.२५/६/२०१९ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१२-१३ या वर्षाकरीता सोलापूर जिल्ह्यातील मौजे गणेशगाव, ता.माळशिरस या वाळूघाटाचा लिलाव मे.लक्ष्मी इंडस्ट्रीज तर्फे प्रो.प्रा.श्री.महेश नामदेव इंगळे यांना सर्वोच्च बोलीस रु.९,९७,५००/- इतक्या रक्कमेस मंजूर करण्यात आलेला होता. त्यानुसार लिलावातील बोलीप्रमाणे लिलावधारकाने लिलावाची संपूर्ण रक्कम रुपये ९,९७,५००/- इतकी शासनजमा केली आहे.

०२. प्रकरणी श्री.लक्ष्मण लोखंडे यांनी माळशिरस येथील मे.सि.ज.सि.डी. यांचे न्यायालयात रे.मु.नं.४/२०१३ अन्वये दाखल केलेल्या दाव्याच्या अनुषंगाने स्टेटस को चा आदेश कोर्टाने पारीत केला. त्यामुळे सदर वाळूगटाचा ताबा लिलावधारकास देण्यात आला नाही तसेच लिलावधारकास वाळूगटातून वाळू उत्खनन करता आले नाही. सदर दावा मा.न्यायालयाने दि.२८/३/२०१३ रोजीच्या आदेशान्वये कामकाजातून वगळण्यात आला आहे. सदर वाळूगटाच्या लिलावाचा कालावधी दि.३१/७/२०१३ पर्यंत होता. मा.न्यायालयाच्या दि.२८/३/२०१३ रोजीच्या आदेशानंतर लिलावधारकास वाळूगटाचा ताबा देण्याची कार्यवाही करण्यात आली नाही.

०३. शासन निर्णय, दि.१२/०३/२०१३ मधील (बी) २ व (बी) (३) अनुसार लिलावधारकाकडून लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या १/४ रक्कम लिलावाच्या दिवशी व उर्वरित ३/४ रक्कम लिलावाच्या दिवसापासून १५ दिवसांच्या आत शासनजमा करुन घेणे आवश्यक होते. जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या दिनांक १७/८/२०२० च्या पत्रानुसार लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या १/४ रक्कम लिलावाच्या दिवशी शासनजमा केली असल्याचे दिसून येत नाही. त्यामुळे शासन निर्णयामधील सदर तरतुदीनुसार लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या १/४ रक्कम रुपये २,४९,३७५/- जप्त करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच वाळू/ रेती निर्गती धोरण, शासन निर्णय दि.२५/१०/२०१० मधील C १५ मधील तरतूदी तसेच परिच्छेद-३ मधील मा.न्यायालयाच्या

आदेशामुळे लिलावधारकास वाळूगटाचा ताबा देता न आल्यामुळे लिलावाची १/४ रक्कम वगळता लिलावाची उर्वरित रक्कम रु.७,४८,१२५/- (रुपये सात लक्ष अठ्ठेचाळीस हजार एकशे पंचवीस फक्त) लिलावधारकास अदा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**०४.** सबब लिलावधारक मे.लक्ष्मी इंडस्ट्रीज तर्फे प्रो.प्रा.श्री.महेश नामदेव इंगळे यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर लिलावधारक यांना परताव्याची अनुज्ञेय रक्कम रु.७,४८,१२५/- (रुपये सात लक्ष अठ्ठेचाळीस हजार एकशे पंचवीस फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीतूमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०१०१२१५५९५९१९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

*महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,*

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revnue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=d7a3efb83c71550e7060464887488d786195babfc16e43c026a74ce9f913a2bc, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.10.12 16:03:30 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, सोलापूर.

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.